**विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयातील पदांच्या आढाव्याअंती सुधारित आकृतीबंध..**

## महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एजीओ२२१६/प्र.क्र.३८/का.१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ एप्रिल, २०२२

**संदर्भ :-**१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.०९.२००१.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. टीईपी-२०२२/प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१.०६.२००६.

३) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र: ओओडी११०१/१५६४ (१३३)/का.१, दिनांक १५.१२.२००६.

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. टीइपी-२००२/प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१.०६.२००६

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. सेवाप्र २०१६/प्र.क्र.६४/कोषा (प्रशा ३), दिनांक ०६.०१.२०१७.

६) वित्त विभाग, यांचे क्र.पदनि-२०१९/प्र.क्र३९/१९/आपुक, दि.०३.०८.२०१९ रोजीचे कार्यवृत्त.

७) शासन निर्णय,विधि व न्याय विभाग क्र.एजीओ२२१६/प्र.क्र.३८/का.१, दिनांक ०५.१०.२०१९.

८) महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मप्रशावि/ संकीर्ण-१०६ /२६४/१० सन २०१९, दिनांक १८.१०.२०१९

९) महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मप्रशावि/ संकीर्ण-१०६ /४१/२ सन २०२०, दिनांक १४.०२.२०२०.

१०) वित्त विभाग, यांचे क्र.पदनि-२०२१/प्र.क्र५५/२१/आपुक दि.२३.०९.२०२१ रोजीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना :-**

विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील ३० पदांचा आकृतीबंध संदर्भ क्र.३ अन्वये निश्चित केला होता. महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील कामकाजाचा सखोल व सर्वंकष आढावा घेऊन, उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने पूर्वीच्या एकूण ३० पदांपैकी, १७ नियमित पदे व ४ अधिसंख्य पदे अशा एकूण २१ पदांचा सुधारित आकृतीबंध संदर्भ क्र.७ अन्वये निश्चित करण्यात आला होता. तथापि, सदर शासन निर्णयातील "विवरणपत्र -अ" व "विवरणपत्र-ब" मध्ये उच्चस्तरीय समितीने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने सुधारणा करावयाच्या असल्याने, या विभागाचा यापूर्वीचा संदर्भ क्र. ७ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सदर शासन निर्णयाद्वारे संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. उच्च स्तरीय सचिव समितीने संदर्भ क्र.६ नुसार, लिपिक टंकलेखक संवर्गातील १० पदांपैकी ५ नियमित व ५ बाहययंत्रणेमार्फत भरण्यास परवानगी दिली आहे. तसेच, वाहनचालक-१, दप्तरी-१, नाईक-१ व शिपाई-४ ही पदे मृत संवर्ग घोषित केली आहेत. तसेच, उच्चस्तरीय सचिव समितीने संदर्भ क्र.१० अन्वये, "शिपाई" संवर्गातील ३ अधिसंख्य पदे + १ बाहययंत्रणेद्वारे भरण्यास परवानगी दिली आहे.

३. संदर्भ क्र. ६ अन्वये, उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेनुसार, महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयासाठी एकूण १७ नियमित पदांच्या सुधारित आकृतीबंधास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सदर १७ नियमित पदे व ५ बाहययंत्रणेद्वारे भरण्याची पदे यांचा संवर्गनिहाय तपशील **"विवरणपत्र-अ"** मध्ये दर्शविला आहे.

४. महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील मृत संवर्ग घोषित केलेल्या वाहनचालक-१, दप्तरी-१, नाईक-१ व शिपाई-३ या पदांवरील कर्मचारी सेवानिवृत्त होईपर्यंत अधिसंख्य पदावर कार्यरत राहतील तद्नंतर ही पदे आपोआप निरसित होतील. अधिसंख्य पदांचा तपशिल **"विवरणपत्र-ब"** मध्ये दर्शविला आहे.

५. "विवरणपत्र-ब" मध्ये दर्शविलेल्या पदांवर कार्यरत असणारे कर्मचारी सेवानिवृत्त होईपर्यंत त्याच पदनामाची व त्याच वेतनश्रेणीमधील अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. या कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्त्याचा खर्च ते यापूर्वी ज्या लेखाशीर्षाखाली वेतन घेत होते त्याच लेखाशीर्षाखाली यापुढेही खर्ची टाकण्यात यावा. या पदांवर काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांचे अन्य पदावर समावेशन झाल्यानंतर अथवा कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर ती पदे आपोआपच निरसित होतील.

६. शिपाई व लिपिक टंकलेखक या पदांवर ८ मनुष्यदिवस इतक्या मर्यादेत सेवा बाहययंत्रणेकडून गरजेनुसार उपलब्ध करुन घेताना वित्त विभाग, शासन परिपत्रक, दिनांक २७.०९.२०१०, दि.०२.०२.२०१३, दि.०२.१०.२०१३ व दि.०२.०८.२०१६ मधील तरतूदींचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

७. हा शासन निर्णय, मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षेखालील उच्चस्तरीय सचिव समितीने सन २०१९ व सन २०२१ मधील अनुक्रमे ४ थ्या व ६ व्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभागाचा अनौ. सं. क्र.१९६/२०२० नुसार तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. असंक-१००१/

प्र.क्र.२९/२००१/ वित्तीय सुधारणा, दि. १०.०९.२००१ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०४१८१६५५५२६३९१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Manisha Anil Kadam

Digitally signed by Manisha Anil Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b4646311d3a20fa0e8638f40554d1f74d87b, serialNumber=46c6aad763d6f6fe01caef299f7bf533d85983b1491695aaae025643f38d12d4, cn=Manisha Anil Kadam
Date: 2022.04.18 16:56:37 +05'30'

**(मनिषा कदम)**
**सहायक सॉलिसिटर- नि- उपसचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव,
२. मा. राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सहसचिव/उपसचिव,
४. प्रधानसचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
५. प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
६. महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल-एक, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), मुंबई.
८. महालेखापाल-दोन, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१० निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (२ प्रती)
११. सामान्य प्रशासन विभाग, का.१४, १४-अ, १४ब
१२. वित्त विभाग/ आपुक,वित्तीय सुधारणा
१३. विधि व न्याय विभाग, कार्या- १७,२३,२४, व २५
१४. निवडनस्ती (का.१).

# विवरणपत्र-अ

## महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील पदांच्या आढाव्याअंती सुधारित स्थिती

(आकृतीबंध)

| अ.क्र. | पदनाम | वेतनस्तर (रुपये) | पद | | आढाव्यानंतर मंजूर नियमित व बाहययंत्रणेमार्फत भरावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| | **गट-अ** | | **स्थायी** | **अस्थायी** | |
| १ | महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई | (i)Pay of Dist. Judge if from Judiciary Service/ Cadre | १ | -- | १ |
| | | (ii)S-२७:११८५००-२१४१०० | | | |
| २ | सहायक संचालक | S-२०:५६१००-१७७५०० | -- | १ | १ |
| | **गट-ब (राजपत्रित)** | | | | |
| ३ | सहायक लेखा अधिकारी | S-१५:४१८००-१३२३०० | १ | -- | १ |
| | **गट-ब (अराजपत्रित)** | | | | |
| ४ | अधीक्षक | S-१४:३८६००-१२२८०० | १ | -- | १ |
| ५ | लघुलेखक-इंग्रजी (निम्नश्रेणी) | S-१४:३८६००-१२२८०० | -- | १ | १ |
| | **गट-क (वर्ग-३)** | | | | |
| ६ | उपलेखापाल | S-१३:३५४००-११२४०० | १ | -- | १ |
| ७ | सहायक | S-८:२५५००-८११०० | ५ | १ | ६ |
| ८ | लिपिक-टंकलेखक | S-६:१९९००-६३२०० | ५ | -- | ५ + ५ बाहययंत्रणेमार्फत |
| | **एकूण** | | **१४** | **३** | **१७ नियमित + ५ बाहययंत्रणेद्वारे** |

# विवरणपत्र-ब

महाप्रशासक व शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील मृत संवर्ग घोषित केलेल्या अधिसंख्य व बाहययंत्रणेमार्फत भरावयाच्या पदांचा तपशील

| अ.क्र. | पदनाम | मृत संवर्ग घोषित केलेल्या अधिसंख्य व बाहययंत्रणेमार्फत भरावयाच्या पदांची संख्या |
|---|---|---|
| १. | वाहनचालक (मृत संवर्ग) | १ |
| २. | दप्तरी (मृत संवर्ग) | १ |
| ३. | नाईक (मृत संवर्ग) | १ |
| ४. | शिपाई (मृत संवर्ग) | ३ + १ बाहययंत्रणेद्वारे |